**Kyasanur forest Disease (KFD) या आजाराच्या प्रतिबंधाकरीता लस खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१८/प्र.क्र.१९०/आरोग्य-८**
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रूग्णालय कंपांउंड,
कॉम्प्लेक्स बिल्डिंग, १० मजला, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १२ नोव्हेंबर, २०१८

**वाचा :-**

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/साथरोग/कक्ष-६ /के.एफ.डी. लस प्रस्ताव/५२१-२२/२०१८, दिनांक ३०.०७.२०१८
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.

**प्रस्तावना :-**

सिंधुदुर्ग जिल्हयात प्रादुर्भाव असलेल्या Kyasanur forest Disease (KFD) या आजाराच्या प्रतिबंधाकरीता केएफडी लसची खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संदर्भीय पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार सदर खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक,आरोग्य सेवा संचालनालयाने संदर्भीय दिनांक ३०.०७.२०१८ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने Kyasanur forest Disease (KFD) या आजाराच्या प्रतिबंधाकरीता ७७८० व्हायल्स (७७,८०० डोसेस) केएफडी लस (अंदाजित रक्कम रु.३२,६७,६००/-) खरेदी करण्यास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) सदरहू बाबींची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींची खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदर बाबींचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्य केलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III /उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management ) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदर खरेदीवर होणारा खर्च “२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- (०१) (४५) पटकी नियंत्रण कार्यक्रम (राज्य क्षेत्र)- २१, पुरवठा व सामग्री ( २२१० ४२८६)” या लेखाशिर्षाअंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८) तसेच सदर बाबींच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

११) संदर्भीय अ.क्र. २ येथील दिनांक २६.०७.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनूसार कार्यवाही करण्यात यावी.

१२) सन २०१८-१९ मध्ये लागण झालेल्या रुग्णांची संख्या तसेच अतिजोखमीच्या लोकांची अंदाजित संख्या ह्या बाबी तपासूनच अंतीम खरेदी आदेश देण्यात यावेत.

**उपरोक्त अनुक्रमांक १ ते १२ येथे नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुख यांची तसेच आरोग्य सेवा संचालनालयाची राहील.**

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०३१७४३४७०४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2018.11.12 13:47:40 +05'30'

**( व. मुं. भरोसे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११) निवडनस्ती (आरोग्य-८)